महिला व बाल विकास विभाग ( खुद्द), मंत्रालय, मुंबई करिता स्वतंत्र आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०२४/प्र.क्र.१३३/का-१**
३ रा मजला, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २२ मे २०२४

**प्रस्तावना -**

महिला व बाल विकास विभाग ( खुद्द ), मंत्रालय, मुंबई करिता एकूण ६८ पदे निर्माण करण्यात आली आहेत. तसेच महिला व बाल विकास विभाग ( खुद्द ), मंत्रालय, मुंबई करिता स्वतंत्र आहरण व संवितरण अधिकारी घोषित केलेला नाही. त्यामुळे विभागाचे आहरण व संवितरण अधिकारी पदाचे कामकाज पहण्यासाठी ज्ञापनाद्वारे आहरण बदलीस प्रतिबंध अधिनियम, २००५ नुसार मंत्रालयीन विभागात अधिकाऱ्यांची सतत बदली करण्यात येते. सबब अधिकारी बदलल्यामुळे किंवा कार्यभारात बदल झाल्यामुळे विभागाचे आहरण व संवितरण अधिकारी हे वेळोवेळी नव्याने घोषित करावे लागत असून सदर प्रक्रीया खुप वेळ खाऊ असून त्यामुळे वेतन विषयक कामकाज तसेच देयके अदा करणे या कामावर विपरित परिणाम होतो.

सबब, महिला व बाल विकास विभाग ( खुद्द), मंत्रालय, मुंबई करिता स्वतंत्र आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

महिला व बाल विकास विभाग ( खुद्द), मंत्रालय, मुंबई करिता कक्ष अधिकारी, का-१४( रोख शाखा ) गट-ब ( राजपत्रित ) या पदास आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५२२१७३१२७४५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.05.22 17:44:54 +05'30'

**( वि.रा.ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल ( लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई, महाराष्ट्र.
२. महालेखापाल ( लेखा परिक्षा-३), मुंबई, महाराष्ट्र.
३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४. अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. कक्ष अधिकारी का-१४ ( रोख शाखा ), महिला व बाल विकास विभाग, मुंबई.
७. निवड नस्ती/ का-१, महिला व बाल विकास विभाग, मुंबई.